**राज्यात “स्टार्टअप च्या अनुषंगाने “अखिल भारतीय स्तरावरील महासंमेलन” आयोजित करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मनासो २८२४/प्र.क्र.६४/कौशल्य-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०७ ऑगस्ट, २०२४

वाचा: १. शासन निर्णय, क्र.कौविऊ-२०१८/प्र.क.९५/अभियान-१, दि. २७ जून, २०१८

प्रस्तावना :

महाराष्ट्र शासनाने कौशल्य, रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभागाच्या अंतर्गत "महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्ट अप घोरण २०१८" धोरण जाहीर केले आहे. या धोरणाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटीची स्थापना करण्यात आली आहे. महाराष्ट्रामध्ये स्टार्टअपना अनुकूल व्यावसायिक वातावरण निर्मिती करून नवकल्पनांना प्रोत्साहन देणे, रोजगाराच्या संधी निर्माण करण्यासाठी स्टार्टअप्सना सक्षम करणे याकरीता सोसायटीतर्फे विविध नाविन्यपूर्ण उपक्रम राबविले जातात. उदा. "महाराष्ट्र स्टार्ट अप-वीक"

स्टार्टअप्स चे नाविन्यपूर्ण उत्पादने / सेवा यांमुळे विविध स्तरावरील सामाजिक आर्थिक समस्यांचे निराकरण करण्यास उपयोगी ठरतात. स्टार्टअप द्वारे नविन उद्योग रोजग़ार निर्मितीही होते. स्टार्टअप या परीसंस्थेच्या विकासाकरीता त्यांना गुंतवणूकदार आणि मार्गदर्शकांशी जोडणे आवश्यक आहे. यामुळे स्टार्टअप यांना भांडवल /गुंतवणूक मिळते तसेच मार्गदर्शकांकडून स्टार्टअप विकासासाठी आवश्यक असे मार्गदर्शन प्राप्त होते. विविध क्षेत्रातील विविध स्टार्टअप यांच्या संमेलनामुळे परस्परपुरक स्टार्टअप विकसित होण्यासही मदत होते. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील विधानमंडळाच्या पावसाळी अधिवेशनामध्ये अतिरिक्त अर्थसंकल्पीय भाषणात “स्टार्टअप च्या अनुषंगाने अखिल भारतीय स्तरावरील महासंमेलन राज्यात आयोजित करण्यात येईल” अशी घोषणा केलेली आहे. त्यानुसार राज्यात स्टार्टअप च्या अनुषंगाने “अखिल भारतीय स्तरावरील महासंमेलन” आयोजन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

स्टार्टअप्सना यांच्या नाविन्यपुर्ण विचारांना व व्यवसाय यांना गुंतवणूकदार आणि मार्गदर्शकांशी जोडण्यासाठी, गुंतवणुकीची संधी उपलब्ध करण्यासाठी तसेच राज्याच्या स्टार्टअप परिसंस्था आणि गुंतवणूकदार यांच्यातील सहकार्याला चालना देण्यासाठी राज्यामध्ये “अखिल भारतीय स्तरावरील स्टार्टअप महासंमेलन” आयोजन करण्यास या शासन निर्णयाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. स्टार्टअप च्या अनुषंगाने “अखिल भारतीय स्तरावरील महासंमेलन” याचे उद्दिष्ट राज्याच्या स्टार्टअप परिसंस्था व गुंतवणूकदार यांच्यातील सहकार्याला चालना देणे, स्टार्टअप्सना गुंतवणुकीच्या संधी मिळवण्यास मदत करणे आणि देशभरातील स्टार्टअप्स, गुंतवणूकदार व उद्योग तज्ज्ञांमध्ये अनुभवांची देवाणघेवाण करणे, विविध क्षेत्रातील विविध स्टार्टअप यांच्या संमेलनामुळे परस्परपुरक स्टार्टअप विकसित करणे असे आहे.

या महासंमेलनांतर्गत विविध विषयांवर तज्ज्ञांशी संवाद, निवडक स्टार्टअप्सना त्यांच्या विचार/कल्पना गुंतवणूकदारांसमोर मांडण्याची संधी, स्टार्टअप्स आणि गुंतवणूकदारांमधील स्वतंत्र बैठका, तज्ज्ञांद्वारे कार्यशाळा, मास्टर क्लासेस, प्रदर्शन स्टॉल्स, स्टार्टअप पुरस्कार इ. यांचा समावेश असेल.

३. “अखिल भारतीय स्तरावरील महासंमेलन” अंतर्गत घेण्यात येणा-या स्टार्टअप्स आणि गुंतवणूकदारांमधील स्वतंत्र बैठका, तज्ज्ञांद्वारे कार्यशाळा, मास्टर क्लासेस, प्रदर्शन स्टॉल्स, स्टार्टअप पुरस्कार इ. बाबीकरीताचे आवश्यक नियोजन आयुक्त तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी यांनी करावे.

४. “अखिल भारतीय स्तरावरील स्टार्टअप महासंमेलन” आयोजित करण्याकरीता एकूण रू. ५.०० कोटी एवढा निधी उपलब्ध करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी झेडए -२, २२३० A३३४ अंतर्गत ३१ सहायक अनुदाने या लेखाशीर्षाखाली उपलब्ध करण्यात येईल. या करीता आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय यांना "नियंत्रण अधिकारी" व सहायक संचालक, लेखा यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. सदर निधी आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई यांनी महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी यांचेकडे वर्ग करुन याबाबतचे लेखे स्वतंत्र व अद्ययावत ठेवावेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०८०७१६३५१२२४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANJUSHA AMIT KARANDE

Digitally signed by MANJUSHA AMIT KARANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=4b1c1c68b2fb7d60932c7a539658f299af288eb5fbe81ceb2178b5deea6f7a28, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BC8432DE7E7323854E5E7499C63951988287A093EF9B088F4B029753EA90109, cn=MANJUSHA AMIT KARANDE
Date: 2024.08.07 16:50:15 +05'30'

**( मंजुषा कारंडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव.
४. मा. उपमुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव.
५. सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता, मंत्रालय, मुंबई.
७. मा. अध्यक्ष /उपाध्यक्ष, विधानसभा,महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.
८. मा.सभापती/ उपसभापती, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.
९. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई मा.
१०. विधानमंडळ, (विधानसभा व विधानपरिषद) सदस्य,महाराष्ट्र राज्य
११. सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
१२. मा. मुख्य सचिव यांचे, वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१३. मा. अपर मुख्य सचिव ,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई
१४. मा. सचिव ,कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१५ . आयुक्त, कौश्यल्य विकास व उद्योजकता आयुक्तालय, मुंबई
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई.
१७. निवड नस्ती. (कौशल्य-२